पोलीस दलातील नियुक्तीनंतर पूर्वचारित्र्य पडताळणीच्या साक्षांकन नमुन्यात चुकीची माहिती दिल्यामुळे सेवासमाप्त करण्यांत आलेल्या पोलीस कर्मचा-याच्या प्रकरणी निर्णय घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक:आरईएन ०३९९/सीआर-२०३/पोल-५अ
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक : २४ जानेवारी २००३.

संदर्भ :१) शासन निर्णय क्रमांक: आरईएन ०३९९/सीआर-२०३/पोल-५अ दिनांक ४.१.२००३ .

**प्रस्तावना :-** पोलीस दलातील नियुक्तीपूर्वी उमेदवारांच्या करावयाच्या चारित्र्य आणि पूर्वचारित्र्याच्या तपासणीबाबतचे धोरण शासनाच्या सर्वसाधारण सेवाविषयक धोरणाशी सुसंगत असावे यादृष्टीने संदर्भाधीन शासन निर्णयाच्या दिनांकापासून पोलीस दलातील सेवेसाठी निवड करण्यांत आलेल्या उमेदवारांच्या पूर्वचारित्र्यांची तपासणी व त्यासंदर्भातील पुढील कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडुन वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या/येणा-या शासन परिपत्रक/ निर्णयानुसार करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापि साक्षांकन नमुन्यात चुकीची माहिती दिल्यामुळे यापूर्वी सेवेतून कमी करण्यात आलेल्या पोलीस शिपायांकडुन शासनास वेळोवेळी प्राप्त झालेल्या विनंती अर्जांच्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय** :- पोलीस दलातील नियुक्तीनंतर पूर्वचारित्र्य पडताळणीसाठीच्या साक्षांकन नमुन्यात चुकीची माहिती दिल्यामुळे नोव्हेंबर २००२ पूर्वी मागील तीन वर्षात सेवेतून कमी करण्यात आलेल्या अस्थायी पोलीस कर्मचा-यांना पुन्हा सेवेत घ्यावे अथवा कसे याबाबत प्रकरणाच्या वस्तुस्थितीनिहाय यथायोग्य पडताळणी करुन निर्णय घेण्यासाठी गृह विभागातील अधिका-यांची खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती नेमण्यासाठी या शासननिर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| **१) श्री सतिश त्रिपाठी**<br>**प्रधान सचिव (अ.व सु.)** | **अध्यक्ष** |
| **२) श्री अ. दा. कारखानीस**<br>**सहसचिव** | **सदस्य** |
| **३) श्री ना. रा. शेरे**<br>**उपसचिव** | **सदस्य** |
| **४) श्री दि. वा. दळवी**<br>**कक्ष अधिकारी (पोल-५अ)** | **सदस्य-सचिव** |

२. दिनांक १ डिसेंबर १९९९ पासूनची साक्षांकन नमून्यात चुकीची माहिती दिल्यामुळे सेवासमाप्त करण्यांत आलेल्या अस्थायी पोलीस कर्मचा-यांची प्रकरणे सदर समितीपुढे विचारार्थ ठेवण्यांत येतील. समितीला अशा प्रकरणांवर निर्णय घेण्यासाठी सहाय्यभूत मार्गदर्शक तत्वे सोबतच्या प्रपत्र "अ" मध्ये विहित करण्यांत आली आहेत.

३. सदर समित्यांच्या बैठकी प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांच्या निर्देशानुसार घेण्यांत येतील. समिती त्यांचा अहवाल शासनास, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन महिन्यात सादर करेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. शं. धुमाळे )
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव, उपमुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
मा.राज्यमंत्री (गृह) ग्रामीण/शहरे यांचे खाजगी सचिव.
पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य मुंबई.
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/ठाणे/पुणे/नागपूर/नाशिक/सोलापूर/औरंगाबाद/नवी मुंबई.
सर्व पोलीस अधिक्षक.
अप्पर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक
[illegible] सर्व संबंधित सदस्य.
निवडनस्ती